दिवंगत झालेल्या किंवा क्षयरोग, कर्करोग इत्यादि गंभीर आजारांमुळे मुदतपूर्व सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या नातेवाईकास नेमणूक देण्याबाबत.

...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:-अकंपा-१०९०-६०५-प्र.क्र.९०-आठ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- २८ जून, १९९१.

पहा:- १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७९-सीआर-२४३-१३अ, दिनांक ५ ऑक्टोबर, १९७९.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा-१०८४-१८९-सीआर-१५५-१३अ, दिनांक ८ मार्च, १९८५.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा-१०८८-९१२-प्र.क्र.१६९-८, दिनांक ६ ऑक्टोबर, १९८९.

शासन निर्णय:-

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा-१०८८-९१२-प्र.क्र.१६९-आठ, दिनांक ६ ऑक्टोबर, १९८९ अनुसार नियम ७[अ] खालील उत्पन्नाच्या मर्यादेत सुधारणा करण्यात आली होती. तदनंतर शासनाने दिवंगत कर्मचा-यांच्या कुटुंबियांना शासकीय गट विमा योजना आणि भविष्य निर्वाह निधी योजनेंतर्गत असणा-या ठेव संलग्न विमा योजनेनुसार देय होणा-या रक्कमांमध्ये वाढ केलेली असल्याने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-अकंपा-१०८८-९१२-प्र.क्र.१६९-आठ, दिनांक ६ ऑक्टोबर, १९८९ मधील नियम ७[अ] आणि नियम ७[ब] खालील टिप १ मध्ये नमूद केलेली रुपये १,५०,०००/- ही ठोक रक्कमेची मर्यादा वाढवून ती रु.१,९५,०००/- [रुपये एक लक्ष पंचाण्णव हजार] करण्याचे आदेश याद्वारे देण्यात येत आहेत.

२. हे आदेश १ जानेवारी, १९९० रोजी अथवा त्यानंतर दिवंगत झाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांच्या कुटुंबियांना लागू होतील.

...२/-

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-८२-९१-सेवा-४, दिनांक २८.२.९१ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[भा.म.भणगे]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*x प्रबंधक, अपील शाखा, उच्चन्यायालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई[ १० जादा प्रतींसह],
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१[लेखा व अनुज्ञेयता], मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१[लेखा परीक्षा], मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२[लेखा व अनुज्ञेयता], नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२[लेखा परीक्षा], नागपूर,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक[निवासी लेखे], कोंकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
वित्त विभाग[सेवा-४][३ प्रती],
निवड नस्ती.

* पत्राने.

...